# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१७

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### जिल्हा मुख्यालय, तालुका मुख्यालय येथे अति महत्वाचे व्यक्तीसाठी दालन निर्माण करणेबाबत

**(१) ९६५८ (३१-०७-२०१५). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जिल्हा मुख्यालय, तालुका मुख्यालय व निमशासकीय कार्यालयामध्ये खासदार, आमदार तसेच विशेष महत्वाच्या व्यक्ती कामानिमित्त वा भेटीसाठी दौरा करीत असतात, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अशा अतिमहत्वाच्या व्यक्तींना बसण्यासाठी कार्यालयात दालने उपलब्ध नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शासन शासकीय व निमशासकीय कार्यालयामध्ये अति महत्वाच्या व्यक्तीच्या भेटीसाठी दालन उपलब्ध करणार आहे काय ?

**श्री. चंद्रकांत पाटील (११-१२-२०१७) :** (१) होय.

(२) जिल्हा मुख्यालय, तालुका मुख्यालय व निमशासकीय कार्यालयामध्ये कार्यालयात कार्यालयीन प्रमुखांसाठी स्वतंत्र दालन उपलब्ध आहेत. दौऱ्यादरम्यान अतिमहत्वाच्या व्यक्ती कामानिमित्त कार्यालयात आल्यास कार्यालयीन प्रमुखांकडे उपलब्ध असलेल्या कक्षात बैठक व्यवस्था करण्यात येते.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील ग्रामीण भागात चो-या व दरोड्याच्या घटनांना प्रतिबंध करणेबाबत**

**(२) १२५१० (२०-०४-२०१७). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.नरेंद्र पाटील, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ग्रामीण भागात चोऱ्या आणि दरोड्याच्या घटना सातत्याने घडत असल्याचे माहे सप्टेंबर, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर चो-या व दरोड्याच्या घटनांना प्रतिबंध करणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२४-११-२०१७) :** (१) हे खरे नाही,

दरोड्याच्या व चोरीच्या गुन्हयात माहे ऑगस्ट, २०१५ ची तुलना करीता सप्टेंबर २०१५ मध्ये दाखल गुन्हयांमध्ये घट झालेली आहे.

दरोड्याच्या गुन्हयात सप्टेंबर, २०१४ व सप्टेंबर, २०१५ ची तुलना करीता गुन्हयांचे प्रमाण सारखे आहे तसेच चोरीच्या गुन्हयात ३५५ गुन्हयांनी वाढ झालेली आहे.

(२) राष्ट्रीय व राज्य महामार्गावरील सशस्त्र गस्ती दरम्यान पेट्रोलपंप, हॉटेल व वाहने इत्यादी ठिकाणे, रेकॉर्डवरील गुन्हेगार व त्यांची आश्रयस्थाने

तपासली जातात. मालमत्तेच्या गुन्ह्यातील आरोपींना तपासून त्यांचेवर प्रतिबंधात्मक तसेच सीआरपीसी १०९, ११० व मुंबई पोलीस अधि.१२२, १४२ इत्यादी अन्वये कारवाई केली जाते तसेच नाकाबंदी व कोबिंग ऑपरेशन मोहिम राबविली जात आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**रेल्वे अर्थसंकल्पात मंजूर करण्यात आलेला मनमाड मालेगांव-धुळे-इंदौर रेल्वेमार्गाचे काम सत्वर सुरु होणेबाबत**

**(३) १९५९८ (०६-०८-२०१६). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) धुळे-नाशिक जिल्ह्याच्या सर्वांगिण विकासाला चालना देणारा, आर्थिक लाभाच्यादृष्टीने रेल्वेस अत्यंत किफायतशीर असलेला आणि रेल्वे अर्थसंकल्पात मंजुरी देण्यात आलेल्या मनमाड - मालेगांव - धुळे - इंदौर रेल्वेमार्गाच्या कामाला गती देण्यासाठी मुंबई येथे दिनांक २८ एप्रिल, २०१६ रोजी झालेल्या उच्चस्तरीय बैठकीत राज्य व केंद्र शासनाची संयुक्त रेल्वे इन्फ्रास्ट्रक्चर कंपनी स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त रेल्वे इन्फ्रास्ट्रक्चर कंपनीची स्थापना करण्यात आली आहे काय व संयुक्त बैठकीतील निर्णयानुसार भूसंपादनासह, रेल्वे मार्ग निर्मितीच्या अनुषंगाने प्रत्यक्ष कार्यवाही सुरु करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, प्रस्तुत प्रकल्प पुर्ण करण्यासाठी निधीची तरतूद रेल्वे मंत्रालयाने केलेली असल्याचे पार्श्वभूमीवर प्रत्यक्ष काम सुरु होण्याचेदृष्टीने कार्यवाहीची सद्य:स्थिती काय आहे ?

**श्री. दिवाकर रावते (१५-११-२०१७) :** (१) होय.

(२) महाराष्ट्र रेल इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट लिमिटेडची स्थापना दिनांक ८ ऑगस्ट, २०१७ रोजी करण्यात आली आहे.

(३) इंदौर-मनमाड (मालेगांव मार्गे) (३६८ कि.मी.) रेल्वे मार्गाचा डिटेल्ड प्रॉजेक्ट रिपोर्ट (DPR) दिनांक १४/७/२०१७ रोजी रेल्वे बोर्डाकडे मंजूरीसाठी पाठविण्यात आला आहे. रेल्वे बोर्डाच्या संमतीनंतरच प्रत्यक्ष कामाची सुरुवात केली जाऊ शकते.

---

## जालना जिल्हयातील दुधना नदीवरील बंधाऱ्याची दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध करण्याबाबत

**(४) २२१५१ (१९-०८-२०१७). श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आंबा गाव (जि.जालना) दुधना नदीवर सन १९९२ साली कोल्हापूरी बंधारा बांधण्यात आल्याने परिसरातील आंबा, डोल्हारा, नांद्रा, बाबुलतारा या गावांना त्याचा उपयोग झाला परंतु सन १९९७ च्या अतिवृष्टीमुळे या बंधाऱ्यांच्या दोन्ही बाजुचा भराव वाहून गेला तेव्हापासून या बंधाऱ्यांची दुरूस्ती केलेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या बंधाऱ्याच्या दुरूस्तीसाठी निधी उपलब्ध करून देण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (१३-१०-२०१७) :** (१) अंबा कोल्हापूरी पध्दतीच्या बंधाऱ्याचे डिसेंबर, १९९७ मधील अतिवृष्टीमुळे नदीतीर वाहून जाऊन नुकसान झाले. नुकसानीच्या विशेष दुरुस्तीचे काम हाती घेऊन पाया बांधकाम, प्रस्तंभ, अंत्याधार व गाईड वॉलची कामे पूर्ण झाली आहेत. स्लॅब, डाऊनस्ट्रिम गाईड वॉल, भराव काम इ. अपूर्ण कामे पूर्ण करण्याचे नियोजित आहे.

(२) सन २०१६-१७ साठी सदर बंधाऱ्यास १.०१ लक्ष निधी मंजूर आहे. या बंधाऱ्याच्या विशेष दुरुस्ती कामाच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांच्याकडे सादर करण्यात आला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे हातिव (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील बौध्दवाडी ते पूर्ण प्राथमिक शाळा नं.१ या रस्त्याचे काम पूर्ण करण्याबाबत**

**(५) २३३९७ (१९-०८-२०१६). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे हातीव (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील बौध्दवाडी ते पूर्ण प्राथमिक शाळा नं.१ या रस्त्याचे काम करुन मिळण्यासंदर्भात स्थानिक नागरीकांनी व लोकप्रतिनिधींनी दिनांक २० मे, २०१६, १६ मे, २०१६, ७ मे, २०१६, व १० मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास मा.मुख्यमंत्री, मा.सार्वजनिक बांधकाम मंत्री, मा.ग्रामविकास मंत्री, सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, सचिव, ग्रामविकास विभाग, जिल्हाधिकारी, रत्नागिरी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रत्नागिरी यांच्याकडे निवेदनाद्वारे मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्याअनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०१-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) विषयांकित मौजे हातिव येथील बौध्दवाडी ते पूर्ण प्राथमिक शाळा नं. १ या रस्त्यांतर्गत दोन रस्त्यांचा समावेश आहे.

अ) हातिव हरपुडे ग्रामीण मार्ग क्र. ४१ या रस्त्याची प्रत्यक्षात लांबी २.५०० कि.मी. असून संपूर्ण लांबी डांबरी पृष्ठभागाची आहे. याच रस्त्यामध्ये हातीव बौध्दवाडीचा समावेश आहे. या रस्त्याचे डांबरी नुतनीकरण करणे आवश्यक असुन सदरील काम अर्थसंकल्पात/रस्ते विशेष दुरुस्ती कार्यक्रमांतर्गत निधीच्या उपलब्धतेनुसार व निकषानुसार टप्प्या-टप्प्याने प्रस्तावित करण्याचा जिल्हा परिषदेचा प्रयत्न राहिल.

ब) हातीव रस्ता ते शाळा क्र. १ हा रस्ता योजनाबाह्य रस्ता असून या रस्त्याची लांबी ०.१५० कि.मी. असून सद्य:स्थितीत रस्त्याचा पृष्ठभाग मातीचा आहे. या रस्त्याचे नवीन बांधकाम करावयाचे झाल्यास लोकप्रतिनिधी यांनी सदर काम विविध योजनेमधून सुचविणे आवश्यक आहे.

---

## नेरळ-माथेरान मिनीट्रेन सेवा पूर्ववत सुरु करण्याबाबत

**(६) २४४४४ (३०-१२-२०१६). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माहे मे, २०१६ पासून अनिश्चित काळासाठी बंद केलेली नेरळ-माथेरान मिनिट्रेन कायमस्वरुपी बंद होण्याची शक्यता निर्माण झाल्याने माथेरान येथील अनेक व्यावसायिक पर्यटकांअभावी बेरोजगार होत असल्याचे माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर मिनीट्रेन सेवा पूर्ववत सुरु करण्याची मागणी माथेरानवासियांनी माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान मा.मुख्यमंत्री व मा.पालकमंत्री, रायगड यांच्याकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून नेरळ-माथेरान मिनिट्रेन सेवा पुन्हा सुरू करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (०९-११-२०१७) :** (१) होय.

(२) व (३) सदर विषय केंद्र शासन (रेल्वे मंत्रालय) यांचे अखत्यारितील आहे. तथापि, मिनी ट्रेन रेल्वे सेवा चालू करणे बाबत सेंट्रल रेल्वेने समिती स्थापन केली आहे. समितीने दिर्घकालीन व अल्पकालीन उपाययोजना करण्याबाबत अहवाल सादर केला असून तो विचाराधीन आहे असे ADGM मध्य रेल्वे यांनी कळविले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**औरंगाबाद जिल्हयातील बाजार सावंगी जवळील रेल ते धामनगाव या रस्त्यासाठी जमीन घेतलेल्या शेतकऱ्यांना मोबदला देण्याबाबत**

**(७) २६००९ (३०-१२-२०१६). श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद जिल्हयातील बाजार सावंगी जवळील रेल ते धामनगाव या रस्त्यासाठी सन १९८१-८२ या वर्षात संपादित केलेल्या जमिनीचा मोबदला शेतकऱ्यांना मिळाला नसल्याचे माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर प्रकल्पग्रस्त शेतकऱ्यांना त्यांच्या संपादित केलेल्या जमिनीला मोबदला देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२३-११-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) सदर प्रकरणी निधी उपलब्ध होण्याबाबत प्राथम्याने कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील पोलीस पाटलांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(८) २६४७२ (०४-०१-२०१७). श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पोलीस आणि जिल्हा प्रशासनातील दुवा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पोलीस पाटलांची राज्यात सुमारे १६ हजार ७४४ पदे रिक्त असून महसूल विभागाच्या उदासिनतेमुळे ही पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पोलीस पाटलांची हजारो रिक्त पदे भरण्याबाबत शासनाची भूमिका काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-१२-२०१७) :** (१) राज्यात पोलीस पाटलांची सन २०१६ अखेर एकूण १५,२६८ पदे रिक्त आहेत.

(२) राज्यातील पोलीस पाटलांची रिक्त असलेली पदे भरणेबाबत सर्व विभागीय आयुक्तांना सूचना देण्यात आल्या आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील सर्व शाळा डिजीटल करण्याबाबत

**(९) २६८१५ (१३-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे, श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक २३७७६ ला दिनांक १४ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भारतनेट प्रकल्पांतर्गत राज्यात प्रत्येक ग्रामपंचायत मधील एका शाळेला डिजीटल कनेक्टीव्हीटीने माहे डिसेंबर, २०१८ अखेर जोडणे प्रस्तावित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, भारत नेट या केंद्र शासनाच्या प्रकल्पामार्फत ग्रामपातळीवरील प्राथमिक/माध्यमिक शाळांना ग्रामपंचायतीमधून जोडणी उपलब्ध करून देण्याबाबत राज्यात सर्वेक्षणाचे सुरु असलेले काम पुर्ण झाले आहे काय,

(३) असल्यास, केंद्र शासनाच्या सूचनेप्रमाणे शासनाची सुधारित प्रकल्प अहवाल तयार करण्याची सुरु असलेली कार्यवाही पुर्ण झाली आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२९-११-२०१७)** : (१) होय, राज्यात भारत नेट प्रकल्पांतर्गत ग्रामपंचायत मधील एका शाळेला Digital Connectivity व्दारे माहे डिसेंबर, २०१८ पर्यंत जोडण्यात येणार आहे.
(२) होय, संबंधित ग्रामपंचायतीमधून शाळांना जोडण्याकरिता सर्वेक्षणाचे प्राथमिक कार्य पूर्ण झाले आहे.
(३) व (४) केंद्र शासनाच्या सूचनानुसार सुधारित प्रकल्प अहवाल तयार करण्यात आला असून केंद्र शासनाकडे मान्यता व निधी उपलब्ध करून देण्याकरिता पाठविण्यात येत आहे.

---

## राज्यातील आश्रमशाळांमधील शिक्षक - कर्मचाऱ्यांसाठी स्वतंत्र आश्रमशाळा संहितेच्या प्रस्तावाबाबत

**(१०) २७४२५ (१२-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : दिनांक ९ डिसेंबर, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक १ मधील प्रश्न क्रमांक १६०२४ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील विमुक्त जाती, भटक्या जमातीच्या अनुदानित आश्रमशाळांमध्ये कार्यरत असलेल्या शिक्षक-कर्मचाऱ्यांसाठी स्वतंत्र आश्रमशाळा संहितेच्या प्रस्तावावर शासनाचा विचार पूर्ण झाला आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे, सदरहु निर्णयाचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०७-११-२०१७) :** (१) व (२) विमुक्त जाती, भटक्या जमातीच्या अनुदानित आश्रमशाळांमंध्ये कार्यरत असलेल्या कर्मचा-यांसाठी स्वंतत्र आश्रमशाळा संहिता तयार करण्याच्या प्रस्तावाची छाननी सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नंदुरबार व धुळे जिल्ह्यात ओव्हरलोड वाहतुकीमुळे रस्त्यांची दुरवस्था झाल्याबाबत

**(११) २७८३१ (१५-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २४६६९ ला दिनांक ८ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नंदुरबार व धुळे जिल्ह्यातील काही तालुक्यातील रस्त्यांवरून वाळू वाहून नेणाऱ्या अवजड वाहनांची वाहतुक मोठ्या प्रमाणात होत असल्याने क्षतीग्रस्त झालेल्या रस्त्यांच्या डांबरीपृष्ठ भागावरील खड्डे भरण्याचे प्रगतीत असलेले काम पुर्ण झाले आहे काय,
(२) असल्यास, नंदुरबार व धुळे जिल्ह्यातील रस्त्यावरील जडवाहनांची अवैध वाहतुक नियंत्रित करण्याबाबत गृह व परिवहन विभागाचे मदतीने कार्यवाही करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्यात अवैध ओव्हरलोड वाहनांच्या वाहतुकीमुळे रस्त्यांची दुरवस्था झाली असून जिवीत व वित्ताची हानी झाल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, रस्त्यांचे संरक्षण तसेच जनतेची जिवीत व वित्त विषयक सुरक्षितता विचारात घेता नंदुरबार व धुळे जिल्ह्यातील तसेच राज्यात महामार्ग, राज्य मार्गावरील अवैध जड वाहनांची वाहतूक रोखणेसंदर्भात कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२७-११-२०१७) :** (१) होय.
(२) होय, हे खरे आहे.
(३) होय, हे खरे आहे.
(४) अवैध जड वाहनांची वाहतूक रोखण्यासाठी परिवहन व पोलीस विभागामार्फत नियमानुसार दंडात्मक कारवाई करण्यात येते.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कोकण पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत एफ ए कंन्ट्रक्शन कंपनीस लघुप्रकल्प या सात धरणांची कामे प्रलंबित असल्याबाबत**

**(१२) २९४६७ (१५-०४-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोकण पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत एफ. ए. कंन्ट्रक्शन कंपनीस शाई नदी पाणीपुरवठा प्रकल्प, गडनदी व जामदा हे मध्यम प्रकल्प आणि शिळ गडनदी, शिरसंगे व येणेरा हे लघुप्रकल्प या सात धरणांची कामे, तसेच काळ जलविदयुत प्रकल्पाचे कामे निविदाद्वारे मिळाले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या प्रकरणाची नस्ती मंत्रालयात नुतनीकरण करताना गहाळ झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबधित जबाबदार अधिका-यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२५-०९-२०१७) :** (१) होय.
लघु प्रकल्पात गडनदी ऐवजी गडगडी व येणेरा ऐवजी चणेरा या नावाने प्रकल्प आहे.
(२) सदर धरणांपैकी शिळ, गडगडी, शिरसिंगे व चणेरा या चार लघुप्रकल्प धरणाबाबतच्या नस्त्या तसेच काळ जलविद्युत प्रकल्पाबाबतची नस्ती मंत्रालय नुतनीकरण करताना गहाळ झाली नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नगरदेवळा (जि.जळगांव) गावात कायमस्वरुपी वाहतुक पोलीस नेमण्याबाबत

**(१३) २९६२७ (१३-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नगरदेवळा (जि.जळगांव) गावात वाहतुक समस्या जटील असल्याने गावात वाहतुक पोलीस कायम असावा अशी मागणी माहे जानेवारी,२०१७ मध्ये वा त्यादरम्यान स्थानिकांनी संबधित अधिका-यांकडे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या मागणीनुसार गावात कायमस्वरुपी वाहतुक पोलीस नेमण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-१२-२०१७) :** (१) नगरदेवळा (जि.जळगांव) यांचेकडील अभिलेखावर नगरदेवळा दूरक्षेत्र येथे वाहतूक पोलीस नेमण्याबाबतचा कोणत्याही स्वरुपाचा लेखी अर्ज प्राप्त नाही. मात्र वाहतूक पोलीस नेमण्याबाबत स्थानिक नागरीकांनी व लोकप्रतिनिधींनी तोंडी स्वरुपाच्या सूचना केल्या आहेत.

(२) नगरदेवळा येथे विशेषत: बाजाराच्या दिवशी वाहतूक समस्या निर्माण होत असल्याने पोलीस कर्मचाऱ्यांसह जिल्हा वाहतूक नियंत्रण शाखा, जळगांव यांचेकडील दोन पोलीस कर्मचाऱ्यांना कायमस्वरुपी मोटारसायकल रोड पेट्रोलिंग नेमण्यांत आली आहे. सदर कर्मचारी हे वाहतूक सुरळीत ठेवण्याचे काम करतात. पेट्रोलिंगदरम्यान अवैध प्रवासी वाहतूकीचे १०५ व मोटार वाहन कायद्यान्वये इतर ४३० केसेस करुन कारवाई केलेली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सर्वांसाठी घरे या महत्वकांक्षी योजनेबाबत

**(१४) २९८६३ (१३-०४-२०१७). श्री.तानाजी सावंत, ॲड.निरंजन डावखरे, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर, श्री.सतिश चव्हाण, ॲड.जयदेव गायकवाड, श्री.जगन्नाथ शिंदे, ॲड.अनिल परब :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सर्वांसाठी घरे या मा.पंतप्रधान यांचे महत्वकांक्षी योजनेंतर्गत सन २०२२ पर्यंत घरे उपलब्ध करुन देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर योजनेंतर्गत किती घरे निर्मितीचे उद्दिष्टे ठरविण्यात आले आहे व त्यासाठी अंदाजे किती कोटी रुपये खर्च येणार आहे व सदर घरे देण्याच्या योजनेतील अटी व शर्तीचे स्वरुप काय आहे,
(३) असल्यास, सदर योजनेसाठी लागणारा किती निधी आतापर्यंत केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिला आहे व त्याव्यतिरिक्त राज्य शासनाचा आर्थिक सहभाग किती आहे,
(४) असल्यास, सदर योजना राज्यात कोणकोणत्या शहरातून राबविण्यात येणार आहे या योजनेच्या कामाची सद्यःस्थिती काय आहे ?

**श्री. प्रकाश महेता (११-१२-२०१७) :** (१) होय.
(२) सदर योजनेंतर्गत राज्य शासनास १९.४० लक्ष घरांच्या निर्मितीचे उद्दिष्ट देण्यात आलेले आहे. केंद्रीय मान्यता व संनियंत्रण समितीने मान्यता दिलेल्या ६० प्रकल्पात १,८२,९८३ घरकुलांचा समावेश आहे. संबंधित अंमलबजावणी यंत्रणाकडून सविस्तर प्रकल्प अहवाल प्राप्त झाल्यानंतर खर्चाचा अंदाज येईल.

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार, शासनाच्या दिनांक ९/१२/२०१५ च्या शासन निर्णयानुसार योजनेच्या अटी व शर्ती ठरविण्यात आलेल्या आहेत. यानुसार लाभार्थी कुटुंबातील व्यक्ती ही आर्थिकदृष्टया दुर्बल घटक/अल्प उत्पन्न गटात मोडणारी असावी. तसेच त्या व्यक्त्तीच्या मालकीचे भारतामध्ये कुठेही पक्के घर नसावे ही मुख्य अट आहे.
(३) केंद्रीय मान्यता व संनियंत्रण समितीने मान्यता दिलेल्या ६० प्रकल्पांपैकी १३ प्रकल्पांसाठी केंद्र शासनाने पहिला हप्ता रु. ३७१.५८ कोटी राज्य शासनास उपलब्ध करुन दिला आहे. १३ प्रकल्पातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांकरितांच्या ६१,९३० घरकुलांसाठी प्रती घरकुल रु. १ लक्ष याप्रमाणे रु. ६१९.३० कोटी इतका राज्य शासनाचा सहभाग असणार आहे.
(४) सदर योजना सद्य:स्थितीत राज्यातील एकुण ३८२ शहरांमध्ये राबविण्यात येत आहे.

---

## राज्यातील विमुक्त जाती भटक्या जमाती आश्रमशाळांना आरटीई संच मान्यता देण्याबाबत

**(१५) २९९९४ (१३-०४-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे : दिनांक १७ डिसेंबर, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ९ मधील प्रश्न क्रमांक २२५२३ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विमुक्त जाती भटक्या जमाती आश्रमशाळांना बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम, २००९ लागू केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शिक्षण व सेवा योजन विभागाच्या शासन निर्णय दिनांक २८ ऑगस्ट, १९८० नुसार संच मान्यता देण्यात येत असून आर.टी.ई. नुसार संच मान्यता देण्याच्या विचाराधीन असलेल्या प्रस्तावावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०७-११-२०१७) :** (१) होय. हे खरे आहे.

(२) व (३) प्रस्ताव, अद्याप प्रस्ताव विचाराधीन आहे.

---

## मे.मनिष फुड इंडस्ट्रिज, गोंदिया यांच्या प्रस्तावावर “राष्ट्रीय अन्न प्रक्रिया” अभियान योजनेंतर्गत कार्यवाही करण्याबाबत

**(१६) ३०००६ (१५-०४-२०१७). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पामध्ये मा.वित्त मंत्री यांनी अन्न प्रक्रिया

उदयोगासाठी नवीन योजनेची घोषणा केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मे.मनिष फुड इंडस्ट्रिज, गोंदिया यांच्या प्रस्तावावर “राष्ट्रीय अन्न प्रक्रिया” अभियान योजनेंतर्गत दिनांक ५ जानेवारी, २०१३ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा अभियान समितीची शिफारस होवून दिनांक ३० जुलै, २०१४ रोजी अभियान कार्यालयास प्राप्त झालेला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, घोषणा केल्यानुसार नवीन योजनेचा शासन निर्णय केव्हा पर्यंत निघणार आहे, तसेच शासन निर्णयातील मार्गदर्शक सुचनेनुसार व उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधिन राहून मे.मनिष फुड इंडस्ट्रिज, गोंदिया यांच्या प्रस्तावावर कार्यवाही होण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (१६-११-२०१७) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

(३) “मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना” राज्यात सुरु करण्यास दि. २०.०६.२०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. मे.मनिष फुड इंडस्ट्रिज, गोंदिया यांनी केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत अर्थ सहाय्याकरिता सादर केलेल्या प्रस्तावास पूर्वसम्मती मिळालेली नाही. पूर्वसंमती प्राप्त होण्यापूर्वी मे.मनिष फुड इंडस्ट्रिज, गोंदिया यांनी त्यांचा प्रकल्प स्थापित केलेला असल्याने, सदर प्रकल्प अर्थ सहाय्याकरिता पात्र ठरत नाही, म्हणून त्यांचा प्रकल्प विचारात घेता येत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्हा परिषदेंतर्गत बांधकाम विभाग क्र.१ व क्र.२ मध्ये चुकीच्या पध्दतीने तांत्रिक मंजुरी देऊन कामे करण्यात आल्याबाबत

**(१७) ३०६२८ (१५-०४-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हा परिषदेंतर्गत बांधकाम विभाग क्र.१ व क्र. २ मध्ये चुकीच्या पध्दतीने तांत्रिक मंजुरी देवून कामे करण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन, चौकशीच्या अनुषंगाने दोषी संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१६-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**यवतमाळ जिल्हयात स्थानिक कारागृहात दोन कैद्यांचा मृत्यू झाल्याबाबत**

**(१८) ३०६५२ (१३-०४-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यवतमाळ जिल्हयात स्थानिक कारागृहात दोन कैद्यांचा वैद्यकिय अधिकाऱ्यांच्या दुर्लक्षामुळे मृत्यू झाला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, दोन महिन्यांच्या आत दोन कैद्यांच्या मृत्यू होणे याबाबत संबंधित अधिकारी यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) तसेच, जिल्हा कारागृहात कैद्यांना VIP ट्रिटमेंट मिळते काय ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) बंदी मृत्यूची सदर दोन्ही प्रकरणे राष्ट्रीय मानवी हक्क आयोग (NHRC) यांचेकडे आहेत. सदर दोन्ही प्रकरणांमध्ये जिल्हादंडाधिकारी चौकशीमध्ये बंद्यांचा मृत्यू वैद्यकीय अधिकारी यांचे निष्काळजीपणाने झालेबाबत नमूद नाही. सबब, कार्यवाहीचा प्रश्न उद्भवत नाही.
(३) हे खरे नाही. जिल्हा कारागृहातील बंद्यांना नियमानुसार देय सवलती देण्यात येतात.

---

## सिंधुदुर्ग जिल्हयात संसर्गजन्य रोग संशोधन प्रयोगशाळा उभारण्याबाबत

**(१९) ३०९४२ (१८-०८-२०१७). श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.नरेंद्र पाटील, श्री.आनंद ठाकूर, श्रीमती विद्या चव्हाण, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.सुनिल तटकरे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सिंधुदुर्ग जिल्हयात संसर्गजन्य रोग संशोधन प्रयोगशाळा उभारण्याचा निर्णय मा.सार्वजनिक आरोग्य मंत्री यांनी ओरोस येथे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घोषित केले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या संसर्गजन्य रोग संशोधन प्रयोगशाळेचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे व प्रयोगशाळेला खर्च किती येणार आहे,

(३) असल्यास, उक्त प्रयोगशाळा कार्यान्वित करण्यासाठी निधी उपलब्ध होण्याकरिता शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२१-०९-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) या संशोधन प्रयोगशाळेत खालील विभाग असतील.

१. अणुजीव आणि विषाणू विभाग, २. साथरोगशास्त्र विभाग, ३. कीटकशास्त्र विभाग व ४. प्राणिजन्य आजार विभाग. साथरोगाचे शास्त्रीय सर्वेक्षण करणे. क्षेत्रिय अधिका-यांचे प्रशिक्षण करणे, हे या प्रयोगशाळेचे स्वरुप असेल. यासाठी अंदाजे रु. ७.०० कोटी इतका खर्च अपेक्षित आहे.

(३) दिनांक ३१/१०/२०१२ च्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये सिंधुदुर्ग सह अन्य ५ ठिकाणी रेण्वीय प्रयोगशाळा करण्याचा निर्णय झाला आहे. सिंधुदुर्ग येथील रेण्वीय प्रयोगशाळेच्या इमारतीचे विस्तारीकरण करुन संसर्गजन्य रोग संशोधन प्रयोगशाळा स्थापन करण्याचे प्रस्तावित आहे. प्रस्तावित संसर्गजन्य प्रयोगशाळेसाठी अंदाजपत्रक व आराखडे तयार करण्याची कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शासनाने भाडेपट्टयाने (लिज) दिलेल्या जमिनीसाठी नियमावली तयार करण्याबाबत

**(२०) ३१३६७ (०६-०८-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शासनाने सहकारी गृहनिर्माण संस्थांना अनेक वर्षापूर्वी भाडेपट्टयाने (लिज) दिलेल्या वर्ग २ मधील जमिनी वर्ग १ मध्ये रुपांतरित करण्याबाबत निर्णय घेवून विधेयकही मंजूर करुन घेतले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भातील नियमावलीच तयार न केल्याने राज्यातील हजारो इमारतींचा पुनर्विकास होण्यास विलंब होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नियमावली तयार करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१३-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीचा धारणाधिकार रुपांतरीत करण्याकामी सखोल अभ्यास करुन उचित शिफारशी करण्याकरिता शासन निर्णय दिनांक २३ मार्च, २०१६ अन्वये अभ्यास समिती नियुक्त करण्यात आली आहे. या समितीचा अहवाल प्राप्त झाल्यावर त्यासंदर्भात शासन निर्णय होऊन त्यानुषंगाने नियमावली प्रसिध्द करण्याचे संकल्पित आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शेतकरी शेती उत्पन्नात सक्षम होण्याकरीता उपाययोजना करण्याबाबत

**(२१) ३१४१७ (०७-०८-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील एका शेतकरी कुटुंबाचे सरासरी मासिक उत्पन्न किती आहे व शेतीसाठी दरमहा सरासरी रुपये २ हजार ६५४ खर्च केल्यानंतर किती पीक उत्पन्न खर्च वजा जाता शेतकऱ्याला मिळते याबाबतचे सर्वेक्षण एनएसएसओ ने केल्याचे त्यांच्या अहवालात निष्पन्न झाले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील शेतकरी कुटुंबाचे उत्पन्न देशात १३ व्या क्रमांकाचे आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्यातील शेतकरी कुटुंब शेती उत्पन्नात अधिक सक्षम व्हावा यासाठी शासनाने कोणत्या उपाययोजना केल्या वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (०८-१२-२०१७) :** (१) होय, कैंद्र शासनाच्या सांख्यिकी व कार्यक्रम अंमलबजावणी मंत्रालयांतर्गतच्या राष्ट्रीय नमुना पाहणी कार्यालयामार्फत, देशपातळीवर व राज्य शासनाच्या नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत राज्य पातळीवर राष्ट्रीय नमुना पाहणीतील ७० व्या फेरीमध्ये (जुलै, २०१२ ते जून, २०१३), शेतकरी कुटुंबाच्या सरासरी मासिक उत्पन्नाची माहिती, नमुना पाहणी तत्वावर संकलित करण्यात आलेली असुन ती अंदाजित आहे. तद्नुसार राज्यातील शेतकरी कुटुंबाचे सरासरी मासिक उत्पन्न रु. ७३८६/- तर सरासरी मासिक खर्च रु. २६५४/- इतका आहे.
(२) व (३) होय.

राज्यातील शेतकरी अधिक सक्षम व्हावा व शेतक-यांचे उत्पन्न दुपटीने वाढविण्यासाठी व त्याचा उत्पादन खर्च कमी करुन उत्पादन वाढीसाठी खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यात येत आहेत:-

१) निविष्ठांवर होणा-या खर्चात कपात करण्याच्यादृष्टीने गाव पातळीवर ग्रामबिजोत्पादन कार्यक्रम कृषी विभागामार्फत घेण्यात येतो.

२) जमिनीची सुपिकता वाढविण्यासाठी मृद आरोग्य पत्रिकांचे वाटप करण्यात येत आहे. शेतक-यांना मृद आरोग्य पत्रिकेप्रमाणे खताचा वापर करण्याबाबत शिफारस केली जाते. त्यामुळे खत वापरामध्ये बचत होते, परिणामी  उत्पादन खर्चात बचत होते.

३) तंत्रज्ञान प्रसार होण्याकरिता पीक प्रात्यक्षिकांचे आयोजन करण्यात येते.

४) कृषी विभागामार्फत पीक किड व रोग सर्व्हेक्षण व सल्ला प्रकल्प (क्रॉप सॅप) या योजनेमार्फत मोबाईल संदेशाद्वारे शेतक-यांना शास्त्रोक्त पध्दतीने किड व रोगाचे बाबत सल्ला दिला जातो. त्यामुळे अनावश्यक किटकनाशकाचा वापर नियंत्रणात ठेवून खर्चामध्ये बचत करण्यात येते.

५) शेतीचे उत्पन्न वाढविण्यासाठी काही मर्यादा असल्याने इतर पूरक उद्योगापासून उत्पन्न आवश्यक आहे. या अनुषंगाने कोरडवाहू शेती अभियान राबविले जात असून यामध्ये भूविकासांव्यतिरिक्त दुग्ध शेती, मत्स्यव्यवसाय, मधूमक्षीका पालन, रेशीम उद्योग, मेंढीपालन यासारख्या उत्पन्न वाढविणा-या जोडधंदयांना प्रोत्साहन दिले जाते.

६) शेतीमाल मूल्यवर्धनासाठी कृषी विभागांतर्गत प्राथमिक व दुय्यम प्रक्रिया केंद्रे उभारण्यासाठी प्रोत्साहन दिले जाते. शेतीमालास बिगर हंगामात भाव मिळण्यासाठी विविध योजनांतर्गत गोडावून व अनुषंगिक सुविधा पुरविल्या जातात. शितगृहाची साखळी निर्माण करण्यात येत आहे.

७) समूह शेतीस चालना देण्यासाठी महामँगो, महाग्रेप, महाबनाना, महाअनार यासारखे फळ पिकांनुसार गट स्थापन करण्यात आलेले असुन अद्यापपर्यंत १३३३ शेतकरी उत्पादक कंपन्या स्थापित करण्यात आलेल्या आहेत. सदर शेतकरी गटांना एसएफअेसी व आत्मांतर्गत आर्थिक सहाय्य केले जाते.

वरीलप्रमाणे उपाययोजना शेतकरी सक्षम होण्यासाठी राज्य शासनाकडून केल्या जात आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**दमणगंगा व नार-पार, औरंगा, अंबिका इ. खोऱ्यातील जलनियोजनाबाबत गठीत केलेल्या संनियंत्रण समितीच्या शिफारशींवरील कार्यवाहीबाबत**

**(२२) ३१४४२ (०८-०८-२०१७). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक २३७४३ ला दिनांक १३ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दिनांक ४ एप्रिल, २०१६ रोजी दमणगंगा व नार-पार, औरंगा, अंबिका इ. खोऱ्यातील जलनियोजनाबाबत गठीत केलेल्या संनियंत्रण समितीने दिनांक २५ जुलै, २०१६ रोजी वा त्यासुमारास शासनास अहवाल सादर केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर अहवालातील महत्वाच्या शिफारशी काय आहेत, जलनियोजन समिती अहवालातील शिफारशींबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०४-१०-२०१७) :** (१) होय,
(२) सदर अहवाल ढोबळ तांत्रिक पडताळणी व व्यवहार्यता अभ्यासावर आधारित आहे. सदर अहवालातील पाणी वापराच्या बृहत आराखडयानुसार दमणगंगा पिंजाळ नदी खो-यात १४७८.९७ दलघमी व नार-पार, अंबिंक, औरंगा खो-यात ८८७.६६ दलघमी पाणी वापर प्रस्तावित आहे. या अहवालातील पाणी वापराच्या बृहत आराखडयाचा सविस्तर तांत्रिक व आर्थिक व्यवहार्यता अभ्यास करून त्यानंतरच शासन या बाबतचे धोरण निश्चित करणार आहे.
तसेच सदर अहवाल महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम २००५ च्या कलम ११(च) मधील तरतूदीनुसार एकात्मिक राज्य जल आराखडयाशी सुसंगत असल्यास याबाबत उचित निर्णय घेण्यात येईल.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही

---

**इंदिरा गांधी शासकिय वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय (मेयो) नागपूर येथे वसतिगृहासाठी फर्निचर खरेदी करण्याबाबत**

**(२३) ३१४५६ (१९-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.मितेश भांगडिया, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) इंदिरा गांधी शासकिय वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय (मेयो) नागपूर येथे रुपये १५ कोटी खर्च करून बांधण्यात आलेल्या वसतिगृहाला निधी उपलब्ध असूनही अद्याप फर्निचर खरेदी झाले नसल्याचे दिनांक ५ मार्च, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वसतिगृहाकरीता फर्निचर खरेदी करणाऱ्यास विलंब करणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०६-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.

यािवषयी सदर कालावधीत संबंधित संस्थेसाठी फर्निचर खरेदीबाबतची प्रक्रिया अंतीम टप्प्यात होती. निविदा प्रक्रियेच्या अनुषंगाने माहे मार्च २०१७ अखेर पुरवठादारास नागपूर सुधार प्रन्यासतर्फे कार्यालयीन आदेश देण्यात आले व सद्य:स्थितीत वसतिगृहात फर्निचर प्रस्थापित करण्यात आले आहे.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील विविध मार्गावरील थांबे चालक मनमानी पध्दतीने अल्पोपहाराचे दर आकारून प्रवाशांची लूट करीत असल्याबाबत**

**(२४) ३१८१९ (०७-०८-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक २८१७१ ला दिनांक १७ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसने प्रवास करणाऱ्या मार्गावरील हॉटेल /धाबाचालक मनमानी पध्दतीने खाद्य पदार्थांचे वाढीव दर आकारून प्रवाशांची लूट करीत असल्यामुळे शासनाने प्रवाशांची लूट रोखण्याकरीता रूपये ३० मध्ये अल्पोपहार ही योजना जाहीर केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या योजनेला राज्य परिवहन मंडळाचे थांबे असलेल्या हॉटेल चालकांकडून प्रतिसाद दिला जात नसून खाद्य पदार्थांचे वाढीव दर आकारून प्रवाशांची लूट सुरूच असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार अशा हॉटेल चालकांविरूध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (०३-११-२०१७) :** (१) होय.
(२) व (३) हॉटेल चालकासोबत करावयाच्या करारपत्रात खादयपदार्थांची दरसूची हॉटेलच्या प्रथम दर्शनी भागावर लावण्यास, तसेच, रुपये ३०/- मध्ये चहा + नाश्ता (दोन बटाटा वडे/दोन मेंदू वडे/पाहे/उपमा/शिरा यापैकी एक) देण्याच्या अटीचा समावेश करण्यात आला आहे. चौकशीमध्ये ज्या हॉटेल मालकांनी अटी व शर्तीचा भंग केलेला आहे. अशा ५ हॉटेलचा थांबा रद्द केलेला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## घाटंजी तालुक्यात (जि.यवतमाळ) येथे चुकीच्या धोरणामुळे अनेक गांवे सिंचनाच्या योजनापासून वंचित राहिल्याबाबत

**(२५) ३२११५ (११-०८-२०१७). श्री.ख्वाजा बेग, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर, श्री.हेमंत टकले, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) घाटंजी तालुक्यात (जि.यवतमाळ) राबविण्यात येणाऱ्या सिंचनाच्या चुकीच्या धोरणामुळे तीव्र टंचाईग्रस्त गावे सिंचन योजनांपासून वंचित राहिल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नूसार घाटंजी तालुक्यातील सिंचनाचे लक्ष्य पूर्ण करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०७-११-२०१७) :** (१) नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासकिय महाविद्यालय व रूग्णालय नागपूर येथील सिटी स्कॅन यंत्र दुरुस्त करण्याबाबत

**(२६) ३२३८० (१८-०८-२०१७). श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक २५२२७ ला दिनांक १३ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकिय महाविद्यालय व रूग्णालय, नागपूर येथील सिटीस्कॅन यंत्र मागील ४ महिन्यांपासून बंद असल्याचे दिनांक १७ फेब्रुवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) तसेच उक्त रुग्णालयात एक्सरे मशीन बंद असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर मशीन्स बंद असल्यामुळे रुग्णांना सिटीस्कॅन व एक्सरे न करताच परत जावे लागते, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन बंद सिटीस्कॅन व एक्सरे मशीनची दुरूस्ती करुन रुग्णांची गैरसोय दूर करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०६-१२-२०१७) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**जत (जि.सांगली) तालुक्यातील कर्जबाजारी शेतकऱ्याने तसेच लातूर जिल्ह्यातील मुलीने आत्महत्या केल्याबाबत**

**(२७) ३२३९९ (०७-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जत (जि.सांगली) तालुक्यातील कर्जबाजारी शेतकरी दाम्पत्याने व लातूर जिल्ह्यातील एका मुलीने लग्नासाठी कर्ज मिळत नसल्यामुळे आत्महत्या केली असल्याचे दिनांक १४ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणाची शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या कुटुंबियास मदत करण्याबाबत तसेच, शेतकरी आत्महत्या रोखण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१६-११-२०१७) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे.

(२) शेतकरी आत्महत्या दोन्ही पात्र प्रकरणी शासन निर्णय दिनांक २३ जानेवारी, २००६ अन्वये कुटुंबियांस रूपये १.०० लाख इतके सानुग्रह अनुदान दिले आहे. शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी उस्मानाबाद व यवतमाळ या दोन जिल्ह्यांमध्ये पथदर्शी प्रकल्प राबविण्यात येत असून त्याअंतर्गत बळीराजा चेतना अभियान राबविण्यात येत आहे. तसेच शेतकऱ्यांची कर्जमाफी करण्यासाठी "छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना २०१७" राबविण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**रायगड जिल्ह्यातील महसूल विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत**

**(२८) ३२४५४ (०७-०८-२०१७). श्री.जयंत पाटील, श्री.बाळाराम पाटील : दिनांक ९ ऑगस्ट, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ९ मधील प्रश्न क्रमांक २९९२१ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रायगड जिल्हयाचे मुख्यालय अलिबाग तसेच जिल्हयातील विविध तालुक्यातील महसूल विभागातील उपजिल्हाधिकारी, नायब तहसिलदार, मंडल अधिकारी, तलाठी इत्यादी पदे अनेक वर्षापासून रिक्त असून ही पदे न भरल्याने कार्यरत असणाऱ्या अधिकाऱ्यांवर अतिरिक्त कार्यभार सोपविला गेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, रिक्त पदांमुळे जिल्हयातील नागरिकांची कामे होण्यास विलंब होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर रिक्त पदे भरण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१४-११-२०१७) :** (१) व (२) रायगड जिल्हयात उपजिल्हाधिकारी संवर्गातील २ पदे, तहसिलदार संवर्गातील ३ पदे, नायब तहसिलदार संवर्गातील ३४ पदे व तलाठी संवर्गातील ३५ पदे रिक्त आहेत. सदर रिक्त पदांचा अतिरिक्त कार्यभार अन्य अधिकारी/कर्मचा-यांकडे सोपविण्यात आला असून नागरीकांच्या कामात विलंब झाल्याची बाब निदर्शनास आलेली नाही.

(३) वित्त विभाग शा.नि. क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.३०/२०१६/ आ.पु.कक्ष दिनांक २५.०५.२०१७ अन्वये वेतनावरील खर्च नियंत्रित करण्याचे निदेश असल्याने विभागाच्या आकृतिबंधास मान्यता प्राप्त करुन घेऊन रिक्त पदे भरण्याची कार्यवाही करण्याचे संकल्पित आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही

---

## मुंबई शहरात राज्यात विशेषत: रिक्षा-टॅक्सीमधील सीएनजी गॅस सिलेंडरची योग्य तपासणी होत नसल्याबाबत

**(२९) ३२४७६ (०७-०८-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई शहरात तसेच राज्यातील प्रमुख शहरांमध्ये रिक्षा-टॅक्सीमधील सीएनजी गॅस सिलेंडरची योग्य तपासणी न करता वाहने चालविली जात असल्यामुळे सदर वाहनांचा अपघात होण्याची शक्यता निर्माण झाली असून अशा धोकादायक वाहनांमधून प्रवाशी प्रवास करीत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार वाहनांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (०३-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) राज्यातील सर्व प्रादेशिक परिवहन प्राधिकरणांना सी.एन.जी / एल.पी.जी इंधनावर चालणाऱ्या वाहनांच्या बाबतीत योग्यता प्रमाणपत्र नुतनीकरणाच्या वेळी तसेच इतर वेळी देखील सी.एन.जी./एल.पी.जी. किट योग्य प्रकारे कार्यरत आहे याची खातरजमा करून योग्यता प्रमाणपत्र जारी करावे अशा सूचना जारी करण्यात आल्या आहेत. तसेच सी.एन.जी./एल.पी.जी. सिलेंडर्सची तपासणी करणे व तपासणी करणाऱ्या केंद्राचे नियमन करण्याची बाब मुख्य विस्फोटक नियंत्रक, नागपूर यांच्यामार्फत सुरू आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

### आवास ग्रामपंचायत हद्दीतील (ता.अलिबाग, जि.रायगड) शासकीय कृषी फळरोपवाटीकेमधून आंब्याची परस्पर विक्री करून शासनाला मिळणाऱ्या उत्पन्नाचा अपहार केल्याबाबत

**(३०) ३२४९३ (०६-०८-२०१७). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **फलोत्पादन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अलिबाग (जि.रायगड) तालुक्यातील आवास ग्रामपंचायत हद्दीतील शासकीय कृषी फळरोपवाटीकेमधील गट नं. ५४२, ५४५ व ५६१ या क्षेत्रामध्ये ३८ आंब्याची झाडे असून कृषी विभाग दरवर्षी आंबे पाडण्यासाठी ग्रामपंचायत व प्रसिध्दीमार्फत येथील ग्रामस्थांना विश्वासात घेऊन लिलाव केला जातो, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कृषी सहाय्यक व आवास ग्रामपंचायतीचे उपसरपंच यांनी ग्रामस्थांना कोणतीही माहिती न देता दिनांक ७ एप्रिल, २०१७ रोजी आंबा पाडेकऱ्यांमार्फत झाडांवरील आंबे काढून परस्पर व्यापाऱ्याला विक्री करण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार शासनाला मिळणाऱ्या उत्पन्नाचा अपहार करणाऱ्या संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (१५-११-२०१७) :** (१) होय
(२) दिनांक ७ एप्रिल, २०१७ रोजी झाडांवरील आंबे काढण्यात आले. मात्र रोपवाटिकेवरील आंब्यांची व्यापाऱ्यांना परस्पर विक्री करण्यात आलेली नाही.
(३) रोपवाटिकेवरील आंबा फळांची प्रथमत: कृषि उत्पन्न बाजार समिती, वाशी येथे विक्री करुन मिळालेले उत्पन्न रु. ७४,८९९/- व रु. ३४२९/- असे एकूण रु. ७८,३२०/- व लिलावाव्दारे मिळालेले रु. २,१०,०००/-असे एकूण रक्कम रु. २,८८,३२०/- शासनास चलनाव्दारे भरणा करण्यात आलेली आहे. त्यामुळे कारवाई करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील बंद असलेले १४ वीज निर्मिती संच सुरु करण्याबाबत

**(३१) ३२६३८ (१९-०८-२०१७). श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील प्रदुषण कमी करण्याच्या उद्देशाने २५ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त काळ वापरात असलेले कोळशावर आधारित कोराडी-२, भूसावळ-२, नाशिक-२, परळी-३, खापरखेडा-२, चंद्रपूर-२ तसेच इतर एक असे १४ वीज निर्मिती संच बंद करण्याचे आदेश केंद्र शासनाने दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सुमारे तीन हजार मेगावॅट वीज निर्मितीत घट झाल्याने तसेच राज्यात होत असलेली विजेची वाढती मागणी यासाठी उपरोक्त संच पुन्हा नव्याने सुरु करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (०६-१२-२०१७)** : (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात पवन ऊर्जा निर्मितीसाठी सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत**

**(३२) ३२७६७ (१८-०८-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **नवीन व नवीकरणीय उर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील पवन ऊर्जेकडे शासनाचे दुर्लक्ष होत असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील वीज तुटवडा लक्षात घेता पवन ऊर्जेसाठी आवश्यक सुविधा उपलब्ध करुन वीज तुटवडा दुर करण्यासाठी शासनस्तरावरुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (३०-११-२०१७)** : (१) हे खरे नाही.

(२) महाराष्ट्र राज्याने "नवीन व नवीकरणीय ऊर्जास्त्रोत यापासून वीज निर्मितीचे एकत्रित धोरण-२०१५" अंतर्गत सन २०२० पर्यंत पवन ऊर्जेव्दारे ५,००० मे.वॅ. निर्मितीचे उद्दिष्ट विविध प्रयोजनांतर्गत निश्चित करण्यात आले असून, या धोरणांतर्गत आतापर्यंत एकूण १६०३.५ मे.वॅ. क्षमतेचे प्रकल्प कार्यान्वित झाले आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात मिठागरांचा व्यवसाय बंद होत असल्याबाबत

**(३३) ३३१७९ (०६-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात पारंपारिक मिठागारांचा व्यवसाय होत असतानाही मागील काही वर्षापासून हा व्यवसाय बंद पडत असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात ४० टक्के मीठ उत्पादन होत असतानाही मीठ व्यवसायाच्या विकासासाठी शासनाकडे एकही विभाग नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२४-११-२०१७) :** (१), (२) व (३) “भारतीय संविधानाच्या सातव्या परिशिष्टामधील केंद्र शासनाच्या यादीमध्ये अ. क्र ५८ येथे पुढीलप्रमाणे विषय दर्शविला आहे.

“Manufacture, supply and distribution of salt By Union agencies, regulation and control of manufacture, supply and distribution of salt by other agencies.”

यास्तव नमूद करण्यात येते की, सदरहू प्रश्नामध्ये उपस्थित केलेला मिठागारांचा व्यवसाय विषयक विषय हा राज्य शासनाशी निगडीत नसून, हा विषय केंद्र शासनाशी निगडीत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हिंगणघाट (जि.वर्धा) तालुक्यातील हिंगणघाट बसस्थानकातून अतिरिक्त प्रवाशी भाडे आकारून प्रवाशांची फसवणूक होत असल्याबाबत

**(३४) ३३२०४ (०७-०८-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगणघाट (जि.वर्धा) तालुक्यातील हिंगणघाट बसस्थानक ते वायगाव (निपाणी) चौरस्ता मार्गे वर्धा बस स्थानकाचे अंतर प्रत्यक्षात ४१ कि.मी. असतांना ते ४२ पेक्षा अधिक कि.मी. असल्याचे दाखवून प्रति प्रवाशी एका टप्प्याचे रूपये ६.३० अधिक वसूल केले जात असल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, हिंगणघाट जाम चौरस्ता प्रवासासाठी अर्ध्या टप्प्याचे भाडे अधिक घेतले जात आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने प्रवाशांकडून नियमानुसार भाडे न आकारता अतिरिक्त प्रवाशी भाडे वसूल करणाऱ्या परिवहन विभागाच्या अधिकाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (०७-११-२०१७) :** (१) व (२) नाही.

(३) वर्धा ते हिंगणघाट (वर्धा, वायगांव, निपाणी, धोत्रा, चौरस्ता, वेळा, हिंगणघाट) हे अंतर ४५.३ कि.मी. इतके आहे. सदर भाडे आकारणी ८ टप्प्यांची करण्यात येत असून, भाडे आकारणी राज्य परिवहन नियमानुसार टप्पा दरपत्रकाप्रमाणे करण्यात येत आहे. हिंगणघाट ते जाम चौरस्ता प्रवासाचे अंतर १२.४ कि.मी. (नवीन बसस्थानकापासून) असून याचे प्रत्यक्ष भाडे १६+१ इतके आहे. त्यामुळे २.५ टप्प्याची भाडे आकारणी राज्य परिवहन महामंडळाच्या प्रचलित नियमानुसार करण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बीड जिल्ह्यातील आत्महत्याग्रस्त कुटुंबाचे सर्वेक्षण करण्याबाबत

**(३५) ३३३३७ (०६-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बीडजिल्ह्यातील आत्महत्याग्रस्त कुटुंबाची भेट घेवुन शेतकऱ्यांच्या होणाऱ्या आत्महत्येबाबतची कारणे शोधण्यासाठी कृषी विभागाच्या आत्मा योजनेंतर्गत अधिकारी व सदस्यांची समिती जिल्हाधिकारी, बीड यांनी माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान नेमली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या समितीत किती व कोणत्या अधिकाऱ्यांचा समावेश आहे, समितीने जिल्ह्यातील किती आत्महत्याग्रस्त कुटुंबाची भेट घेतली आहे, समितीने अहवाल सादर केला आहे काय, अहवालात काय आढळून आले,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (१८-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सदर समितीमध्ये खालील ७ अधिकाऱ्यांचा समावेश आहे.

१) श्री. बी.बी. कोळेकर, प्रकल्प संचालक आत्मा, बीड, २) श्री. बी. एम. गायकवाड, कृषि उपसंचालक जिअकृअ, बीड, ३) श्री.पी.आर. चव्हाण, प्रकल्प उपसंचालक, आत्मा बीड, ४) श्री. डी. बी. बीटके, कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद, बीड, ५) डॉ.एन.के.भुत्ते, विषय विशेषज्ञ, के. व्ही. के. डिघोळअंबा, अंबाजोगाई, ६) डॉ.शैलेश कैंडे, जिल्हा उपायुक्त, पशुसवंर्धन, बीड, ७) श्री.सुहास पंके, विषय विशेषज्ञ, के. व्ही. के. डिघोळअंबा, अंबाजोगाई या व्यतिरिक्त ३ अशासकीय सदस्यांचा समावेश करण्यात आला असून एकूण १३ सदस्य आहेत. समितीने आत्महत्याग्रस्त ८ शेतकरी कुटुंबाच्या भेटी घेतल्या आहेत. समितीचा अहवाल जिल्हाधिकारी यांना अद्याप सादर करण्यात आलेला नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात तलाठी व मंडळ अधिकारी यांची पदे भरण्याबाबत

**(३६) ३३३७१ (०६-०८-२०१७). श्रीमती स्मिता वाघ, श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात तलाठ्यांची तीन हजार आणि मंडळ अधिका-यांची सुमारे ५०० पदे टप्या टप्याने भरण्याच्या महसूल विभागाच्या प्रस्तावाला मान्यता दिल्याचे दिनांक २९ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बीड जिल्ह्यातील महसूल विभागातील सर्व रिक्त पदाची पूर्तता करण्याबाबत जिल्हाधिकारी, बीड यांचेमार्फत प्रस्ताव विभागीय आयुक्तांकडे सादर केला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, बीड जिल्ह्यात महसूल विभागातील उपजिल्हाधिकारी, तहसिलदार, नायब तहसिलदार, लिपीक व शिपाई संवर्गातील पदावरील एकूण किती पदे रिक्त आहेत,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१३-११-२०१७) :** (१) व (२) राज्यातील वाढती लोकसंख्या व वाढते नागरीकरण यानुषंगाने क्षेत्रिय यंत्रणेच्या कामात झालेली वाढ विचारात घेता, राज्यात एकूण ३१६५ नवीन वाढीव तलाठी साझे व ६ तलाठी साझांसाठी १ महसूली मंडळ या तत्वाप्रमाणे ५२८ नवीन महसूली मंडळे स्थापन करुन सदरची नवीन पदे ४ वर्षात टप्प्या-टप्प्याने भरण्यास, शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दिनांक २५ मे, २०१७ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

(३) व (४) बीड जिल्हा महसूल प्रशासनात आज अखेर उपजिल्हाधिकारी संवर्गातील-५, तहसिलदार संवर्गातील-३, नायब तहसिलदार संवर्गातील-७, लिपिक संवर्गातील-७०, तलाठी संवर्गातील-५० व शिपाई संवर्गातील-४८ अशी

एकूण १८३ पदे रिक्त आहेत. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६ / प्र.क्र.३०/२०१६/आ.पु.कक्ष, दि. २५/०५/२०१७ अन्वये विभागाचा सुधारीत आकृतीबंध अंतिमत: मंजूर करुन घेतल्यानंतर रिक्त पदे भरण्याचे संकल्पित आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औषधांच्या आणि उपकरणांच्या दरात तफावत येत असल्याने समितीमार्फत निर्णय घेण्याबाबत

**(३७) ३३४१९ (१८-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सार्वजनिक आरोग्य, वैद्यकिय शिक्षण तसेच स्थानिक स्वराज्य संस्थामार्फत होणाऱ्या औषधांच्या आणि उपकरणांच्या दरात तफावत येत असल्याने आरोग्य विभागाने त्यांच्याकडील औषध खरेदी माजी पोलीस महासंचालक, श्री. प्रविण दिक्षीत यांच्या अध्यक्षतेखाली नेमण्यात आलेल्या समितीमार्फत करण्याचा निर्णय माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरचा निर्णय घेण्याची कारणे काय आहेत, तसेच त्यांची अंमलबजावणी केव्हापासून करण्यात येणार आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१२-१०-२०१७) :** (१) हे खरे आहे.
(२) मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठाने जनहित याचिकेबाबत दिनांक ०३/०५/२०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. यांच्याकडे खरेदीकरीता प्रशासकीय व्यवस्था होईपर्यंत केवळ तात्पुरती व्यवस्था म्हणून सदर निर्णय घेण्यात आला असून दिनांक १५/०६/२०१७ पासून सदर निर्णय अंमलात आला होता.

तद्नंतर दिनांक २६/०७/२०१७ च्या शासन निर्णयानुसार औषधे, तदअनुषंगिक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे इत्यादी बाबींची खरेदी व

वितरण हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. या महामंडळाकडे सोपविण्याचा निर्णय घेण्यात आलेला असून तेथील खरेदी कक्ष दिनांक १५/०८/२०१७ पासून कार्यान्वित करण्यात आलेला आहे..

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई उपनगरातील आरे कॉलनीत बौध्द स्मशानभूमी उभारण्याबाबत

**(३८) ३३४३७ (०६-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई उपनगरातील आरे कॉलनीमध्ये बौध्द स्मशानभूमी उभारण्याची मागणी जिल्हाधिकारी, मुंबई यांच्याकडे दिनांक १८ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास बुध्दिस्ट फाऊंडेशन या संस्थेने केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने याबाबत निर्णय घेऊन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१३-११-२०१७) :** (१), (२) व (३) मरोळ, आरे चेक नाका येथे बौध्द स्मशानभुमी उभारण्याकरिता भुखंड मिळण्याबाबत अध्यक्ष, बुध्दिस्ट फाऊंडेशन, मुंबई यांनी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्याकडे अर्ज केला होता. त्यानुषंगाने बुध्दिस्ट फाऊंडेशन, मुंबई यांच्या प्रतिनिधीसोबत स्थळ पाहणी केली असता, त्यावेळी त्यांनी दाखवलेली जागा मौजे परजापूर, ता. अंधेरी येथील स.नं. ९ ब, न.भू.क्र. ११ पैकी असल्याचे आढळून आलेले आहे. सदरच्या जमिनीच्या गा.न.नं. ७/१२ मध्ये मागणी केलेल्या क्षेत्रावर धारक सदरी "बॉम्बे मिल्क स्किम आरे कॉलनी" यांचे नांव आहे. सदरचे क्षेत्र कृषि व पदुम विभाग यांचे मालकीचे असल्याने, मागणी केलेले क्षेत्र निर्बाध्यरित्या वाटपासाठी उपलब्ध नाही. त्यामुळे महसूल व वन विभागाकडून सदर जमीन बुध्दिस्ट फाऊंडेशन, मुंबई यांना प्रदान करता येणार नाही, ही वस्तुस्थिती जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी दिनांक २२/०९/२०१७ रोजीच्या पत्रान्वये बुध्दिस्ट फाऊंडेशन, मुंबई यांना कळविलेली आहे.

---

**मुंबईत लोढा विकासकाने प्रकल्पाच्या जाहिरातीसाठी राजभवनाचा फोटो बेकायदेशीररित्या वापरल्याबाबत**

**(३९) ३३४८२ (११-०८-२०१७). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत लोढा विकासकाने आपल्या प्रकल्पाच्या जाहिरातीसाठी सुरक्षेसाठी संवेदनशील असलेल्या राजभवनाचा फोटो बेकायदेशीररित्या वापरल्याचे दिनांक ३० मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार संबंधित विकासकावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१२-१२-२०१७) :** (१) बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाच्या कार्यक्षेत्रातील कोणत्याही पोलीस ठाण्यात लोढा विकासकाने त्यांच्या प्रकल्पाच्या जाहिरातीसाठी राजभवनाचा फोटो बेकायदेशीररित्या वापरल्याबाबत गुन्हा नोंद नाही.

(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**दहिवडी (जि.सातारा) बस स्थानकाची इमारत वापराविना पडून असल्याबाबत**

**(४०) ३३९६० (०६-०८-२०१७). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दहिवडी (जि.सातारा) बस स्थानकात मागील चार वर्षे बांधलेली सुसज्ज इमारत वापराविना पडून असल्यामुळे प्रवाशांची गैरसोय झाल्याने दिनांक ३० एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खारे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने बसस्थानकात मूलभूत सुविधा पुरविण्याबाबत व बसस्थानक सुस्थितीत सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (१३-११-२०१७) :** (१) व (२) राज्य परिवहन महामंडळाच्या दहिवडी बसस्थानकाची इमारत सन १९७७-७८ साली बांधण्यात आलेली असून, सदर इमारत सुस्थितीत आहे.

सदर बसस्थानकामध्ये सन-२०१४ साली महिलांसाठी मा.खासदारांच्या स्थानिक विकास निधीतून स्वतंत्र शौचालय बांधण्यात आले आहे. सदरचे शौचालय वापरात आणण्यासाठी 'फॅसिलिटी मॅनेजमेंट सर्विसच्या माध्यमातून मे.ब्रिक्स इंडिया प्रा.लि.या एजन्सीला कार्यादेश देण्यात आला आहे. निविदा प्रपत्रामधील कालमर्यादेत स्वच्छतागृहांच्या साफसफाईचे काम केले जाणार आहे.

सद्य:स्थितीत बसस्थानकामध्ये पिण्याचे पाणी, लाईट, शौचालय इ. सुविधा उपलब्ध असून, बसस्थानकाचे डांबरीकरण सुस्थितीत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विदर्भातील जिल्हयातील आगारामधून शिवनेरी व अश्वरथ व्होल्वो बसेस सुरू करण्याबाबत**

**(४१) ३४००८ (०७-०८-२०१७). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परिवहन विभागाने प्रवाशांच्या सोयीसाठी राज्याच्या विविध डेपोमध्ये शिवनेरी व अश्वरथ व्होल्वो बसेस सुरू केल्या असून उक्त बसेसना प्रवाशांचा चांगला प्रतिसाद मिळत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विदर्भातील अकोला, वाशिम व बुलढाणा या डेपोमधून नागपूर, पुणे, औरंगाबाद या ठिकाणी प्रवासी असल्याने सदर ठिकाणी शिवनेरी व अश्वरथ या बसेस सुरू करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (०३-११-२०१७) :** (१) होय.
(२) राज्य परिवहन महामंडळाच्या सर्व विभागांमध्ये प्रवाशांना माफक दरांमध्ये वातानुकूलित सेवा उपलब्ध होण्याकरिता महामंडळाद्वारे "शिवशाही" या नावाने वातानुकूलित बससेवा सुरु करण्याचा निर्णय घेतलेला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे खासापुरी (ता.परंडा, जि.उस्मानाबाद) पुरग्रस्त गावांचे पुनर्वसन करण्याबाबत**

**(४२) ३४०८१ (०७-०८-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे खासापुरी (ता.परंडा, जि.उस्मानाबाद) पुरग्रस्त गावाची सन १९६५ पासून प्रलंबित राहिलेली पुनर्वसनाची प्रकिया पूर्ण करण्याबाबत ग्रामस्थांनी तसेच स्थानिक लोकप्रतिनिधींनी मा.महसूल मंत्री महोदयांकडे तसेच जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांच्याकडे पत्रव्यवहार करूनही अद्यापि कोणतीच कार्यवाही झालेली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पुरग्रस्ताचे सर्व्हे नंबर ३९/ब क्षेत्र १५ एकर ०१ गुंठामध्ये जमीन मालक कल्याणराव कोंडेराव देशमुख यांच्या जमिनीत स्थलांतरीत करण्यात आले असून अद्यापि शासनाने पुनर्वसनासाठी संपादन केलेल्या जमिनीचा मावेजा दिलेला नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर पुरग्रस्तांचे पुनर्वसन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१४-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही.

खासापुरी धरणाची भूसंपादन प्रक्रिया १९५४ साली पूर्ण झाली. या भूसंपादनामध्ये खासापुरी गावातील कोणत्याही वस्तीचा अंतर्भाव येत नव्हता.

त्यामुळे पुनर्वसनाचा प्रश्न निर्माण झाला नाही. तथापि, १९५७ साली मोठया प्रमाणावर पाऊस पडून धरणातील ओव्हर फ्लोमुळे पूर परिस्थिती निर्माण झाली. त्यामुळे धरणातील पुढील भागातील खासापुरी गावातील नागरिकांनी श्री.कल्याणराव देशमुख यांच्या गट नं. ३९/ब मधील १५ एकर शेतामध्ये स्थलांतर करुन वस्ती केली. जमीन मालक श्री.कल्याणराव देशमुख यांनी गावकरी यांचेकडून मोबदला घेऊन खाजगी वाटाघाटीने सदर जमीन गावकऱ्यांना राहाण्यासाठी स्वखुशीने दिलेली आहे. भूसंपादन अधिनियम १८९४ अ अन्वये सदर जमिनीचे संपादन केलेले नसल्याने मावेजा वाटप करण्याचा प्रश्न उदभवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**स्वारगेट (जि.पुणे) बस स्थानकात प्रवाशांची फसवणुक केल्याबाबत**

**(४३) ३४१०२ (०६-०८-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य परिवहन महामंडळाच्या स्वारगेट (जि.पुणे) बस स्थानकात एका व्यक्तिने खाकी ड्रेस घालून राज्य परिवहन महामंडळाचा वाहक असल्याचे सांगून प्रवाशांकडून तिकीट विक्री करुन पैसे उकळण्याचा प्रकार दिनांक २८ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त स्थानकात राज्य परिवहन महामंडळाने सीसीटीव्ही व सुरक्षा व्यवस्था केली असतानाही अशा घटना घडत असून राज्य परिवहन कर्मचारी व अधिकारी यांच्या संगनमताने प्रवाशांची फसवणुक होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (०७-११-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

सदरची घटना दि. ०८/०६/२०१७ व दि. २६/०६/२०१७ रोजीची आहे.

(२) नाही.

(३) दि. ०८/०६/२०१७ रोजी ७ प्रवाशांना रु.९३०/- ची व दि. २६/०६/२०१७ रोजी ७ प्रवाशांना रु.१०६७/- ची अनधिकृतपणे तिकीटविक्री करुन प्रवाशांची फसवणूक केल्याबद्दल स्वारगेट पोलीस स्टेशन येथे अनुक्रमे गुन्हा रजिस्टर क्र. १८९/१७, दि. ०८/०६/२०१७ व ०२०७/१७, दि. २६/०६/२०१७ भा.द.वि.कलम १७०, ४२० अन्वये पोलिसांनी गुन्हा दाखल केलेला आहे.

या दोन्ही गुन्हयांच्या अनुषंगाने पोलीस तपासात, पोलीस कर्मचारी, वाहतूक नियंत्रक व राज्य परिवहन सुरक्षारक्षक यांनी पाळत ठेवून दि. ०३/०७/२०१७ रोजी पहाटे ०४.०० वाजताचे सुमारास सोलापूर विभागाच्या स्वारगेट-बार्शी बस क्र. एमएच १४-बीटी-२७१६ या मुक्कामी पार्किंगमध्ये असलेल्या बसमध्ये सदर इसम प्रवाशांना बोलावून तिकीटे देण्याच्या तयारीत असताना, स्वारगेट बसस्थानकावरील सोलापूर पॉईंटवर कामगिरी करणारे वाहतूक नियंत्रक यांनी त्याला विचारणा केली असता सदर इसम मॅन्युअल तिकिट ट्रे सोडून पळून जात असताना कामगिरीवरील सुरक्षारक्षक व इतर दोन कंत्राटी सुरक्षारक्षकांनी सदर इसमास पकडले व पोलिसांच्या ताब्यात दिले.

सदर प्रकरणी एफ.आय.आर.क्र.२२२, दि. ०३/०७/२०१७ भा.द.वि.कलम १७०, ४२० व ५११ अन्वये स्वारगेट पोलिसांनी गुन्हा दाखल केलेला आहे. सदर इसमास अटक करण्यात आलेली आहे. त्याचे नाव श्री.सुनिल विष्णू जाधव, वाहक क्र. १३२४३१, राज्य परिवहन पंढरपूर आगार असून त्यास दि. ३१/०१/२०१७ पासून यापूर्वी केलेल्या अपहार प्रकरणी निलंबित केलेले आहे. श्री. जाधव यास दि. ०८/०७/२०१७ पर्यंत पोलीस कोठडी व दि. ०९/०७/२०१७ पासून १४ दिवसांची न्यायालयीन कोठडी मा.न्यायालयाने सुनावलेली आहे.

राज्य परिवहन महामंडळाच्या विभागीय कार्यालयाचा आदेश क्र. ५५३/१७ दि. १०/०७/२०१७ नुसार श्री. सुनिल जाधव, वाहक राज्य परिवहन पंढरपूर आगार यास बडतर्फ करण्यात आलेले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्हापरिषदने पाणीटंचाई आढावा बैठका रद्द केल्याबाबत

**(४४) ३४१४७ (१८-०८-२०१७). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हा परिषदने पाणी टंचाईला प्राधान्य देण्याऐवजी, कर्मचाऱ्यांच्या बदल्यांना प्राधान्य देऊन, पाणीटंचाई आढावा बैठका रद्द केल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मे महिन्याच्या सुमारास पाणीटंचाई निर्माण झालेली असताना जिल्ह्यातील ११ प्रकल्पांमध्ये पाणीटंचाई झालेली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकरणी अधिकाऱ्यांच्या उदासिनतेमुळे पाणीटंचाईची दाहकता वाढून जनतेची गैरसोय झालेली आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर दोषी अधिकाऱ्यांवर कारवाई करण्यासाठी तसेच पाणीटंचाई दूर होण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७) :** (१) नाही, हे खरे नाही. जिल्हा परिषदेमार्फत पाणी टंचाई अंतर्गत उमरखेड, महागांव, पुसद येथील बैठका घेण्यात आल्या होत्या. त्यापूर्वी लोकप्रतिनिधींनी संबंधीत पंचायत समिती स्तरावर घेतलेल्या आढावा बैठकांमध्ये पंचायत समिती मार्फत टंचाई निवारणार्थ कामे प्रस्तावित करण्यात आली होती. त्यानुषंगाने तांत्रिक निकष लावून कृती आराखडा मंजूर करण्यात आला. जिल्हा परिषद बदल्या शासन धोरणानुसार असल्यामुळे टंचाईच्या तालुका अंतर्गत बैठका पुढे ढकलण्यात आल्या तथापि जि.प. जल व्यवस्थापन सभा व स्थायी समिती सभे अंतर्गत नियमित टंचाईचा आढावा घेण्यात आला होता.

(२) नाही, हे खरे नाही. सन २०१६-२०१७ मध्ये यवतमाळ जिल्ह्याकरीता पाणी आरक्षण समिती कडून २३ प्रकल्पामधील ३०.२९४ द.ल.घ.मी. पाणी १५४ गावांकरीता आरक्षित करण्यात आले होते. त्या पैकी पंचायत समितीच्या मागणीनुसार २६.१८ द.ल.घ.मी. पाणी वेळोवेळी पिण्याच्या पाणी

टंचाई निवारनार्थ नदिपात्रात सोडण्यात आले होते.
(३) हे खरे नाही.
(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे जांभुळ (ता.कल्याण, जि.ठाणे) येथील जमिनीवर भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे स्मारक उभारण्याबाबत

**(४५) ३४१९२ (०६-०८-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे** : सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे जांभुळ (ता.कल्याण, जि.ठाणे) येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या नावे दिनांक १८/०६/१९३५ रोजी वा त्यासुमारास स्थानिक शेतक-यांकडून जमीन खरेदी झालेली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू जमिनीपैकी काही जमीन डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्याकडून दि रावळगाव शुगर फॅक्टरीला विकत देण्यात आल्याची महसूल दप्तरी नोंद झालेली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी खरेदी केलेल्या जमिनीपैकी किती जमीन शासनाकडे जमा आहे,
(४) असल्यास, सदरहू उपलब्ध जमिनीवर भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे स्मारक व्हावे अशी मागणी लोकप्रतिनिधीनी डॉ.बाबासाहेब आंबेडकर प्रेमी जनता व संस्थांकडून करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१८-११-२०१७) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी मौजे जांभुळ, ता.कल्याण, जि.ठाणे येथे दिनांक १८/०६/१९३५ रोजी खरेदी केलेल्या जमिनीपैकी कोणतीही जमीन शासन जमा झालेली नाही.

(४) होय, हे खरे आहे.

(५) व (६) मौजे जांभुळ, ता.कल्याण, जि.ठाणे येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे स्मारक बांधण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने शासनाच्या प्रचलित धोरणानुसार उचित कार्यवाही करण्याच्या दृष्टीने जिल्हाधिकारी, ठाणे यांच्याकडून अहवाल मागविण्यात आला आहे.

---

**"व्हिलेज ट्रान्सफॉर्मेशन" योजनेंतर्गत राज्यातील मागास गावांचा विकास करण्याबाबत**

**(४६) ३४३३६ (१८-०८-२०१७). श्री.तानाजी सावंत : तारांकित प्रश्न क्रमांक २७६९४ ला दिनांक १६ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कॉर्पोरेट क्षेत्र आणि राज्य शासनाच्या निधीच्या मदतीने राज्यातील सर्वाधिक मागास गावांमध्ये आमूलाग्र बदल घडवून त्यांचे स्मार्ट गावांमध्ये रुपांतर करण्यासाठी “व्हिलेज ट्रान्सफॉर्मेशन" ही योजना शासनाने हाती घेतली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील विदर्भ, मराठवाडा, कोकण तसेच पश्चिम महाराष्ट्रातील किती गावांचा या योजनेमध्ये समावेश करण्यात आला आहे,

(३) असल्यास, सदर योजनेतून राज्यातील किती मागास गावांचा विकास झालेला आहे ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७) :** (१) होय. हे खरे आहे.

(२) सध्या राज्यातील पालघर, नंदुरबार, औरंगाबाद, वर्धा, बीड, परभणी, रायगड, यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर, नांदेड, अमरावती या १२ जिल्हयांतील १४० ग्रामपंचायतींचा या योजनेमध्ये समावेश करण्यात आलेला आहे.

(३) ग्राम सामाजिक परिवर्तन अभियानांतर्गत निवडलेल्या गावांचे गाव विकास आराखडे संबंधित गावांमध्ये नियुक्त केलेल्या मुख्यमंत्री ग्राम परिवर्तकामार्फत (CMGP) तयार करण्यात आलेले आहेत. या गाव विकास आराखड्यांना ग्रामसभेची मान्यता घेण्यात येत आहे. या गाव विकास आराखड्यानुसार या प्रकरणी कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## राज्यातील वाढते रस्ते अपघात रोखण्याबाबत

**(४७) ३४३३८ (११-०८-२०१७). श्री.तानाजी सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वाहनांची वाढती संख्या आणि वाहतुकीच्या समस्येमुळे दर ४० मिनिटाला एकजण रस्ते अपघातात मृत पावत असल्याची बाब पोलिसांकडून माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान प्राप्त अहवालानुसार महाराष्ट्र राज्य हे देशात दोन क्रमांकाचे अपघातग्रस्त राज्य ठरले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वाढते रस्ते अपघात रोखण्यासाठी शहर आणि महामार्ग पोलिसांना काही विशेष ॲक्शन प्लॅन दिले आहेत काय किंवा काही खास उपाययोजना करण्याचे निश्चित केले आहे काय,

(३) असल्यास, कार्यवाहीचे स्वरुप काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-१२-२०१७) :** (१) भुपृष्ठ वाहतूक आणि राजमार्ग परिवहन मंत्रालय यांच्या सन २०१६ च्या अहवालानुसार महाराष्ट्र हे देशात दोन क्रमांकाचे अपघातग्रस्त राज्य नसून चार क्रमांकाचे राज्य आहे.

(२) व (३) वाढते रस्ते अपघात रोखण्यासाठी खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यात येतात :-

i) रस्ते अपघातांना पायबंद बसणे तसेच जिवित व वित्तहानी अधिक प्रमाणात होऊ नये याकरीता प्रभावी प्रक्रिया राबविण्यात येत असते. अपघाताचे ठिकाणी तात्काळ पोलीस मदत पोहोचून वाहतूक नियमन व जखमींना विनाविलंब वैद्यकीय मदत मिळवून देण्यात येते.

ii) शाळा व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे तसेच वाहनचालकांचे वाहतुकीच्या नियमांसंदर्भात प्रबोधन करण्यात येते महामार्ग सुरक्षा पथकाकडून पथनाटयाद्वारे जनजागृती तसेच वाहनचालकांची नेत्रतपासणी व आरोग्यतपासणी शिबिरांचे आयोजन करण्यात येते.

iii) महामार्गावर वारंवार घडणाऱ्या अपघातस्थळांची (Black Spot) माहिती घेऊन त्याठिकाणी वेगमर्यादेचे सूचनाफलक लावण्यात आले आहेत.

या ठिकाणी वाहतूक पोलिसांमार्फत जास्तीत जास्त गस्त घालण्यात येते व कसूरदार वाहनचालकांवर योग्य ती दंडात्मक कारवाई करण्यात येते.

iv) महामार्गावर सर्व ठिकाणी रस्त्याचेकडेला ब्रिफेन वायर अथवा सिमेंट/मेटल बॅरिअर बसविण्यात येतात. घाट क्षेत्रात तीव्र उतारापुर्वी कमी जाडीच्या रम्ब्लर स्ट्रीप बसविण्यात येतात.

v) वाहनचालकांना आगाऊ सूचना मिळण्यासाठी कमी शब्द व चिन्हांचा अधिक वापर करुन रोड मार्किंग व साईनेज यामध्ये सुधारणा.

vi) वाहनांचे नियंत्रण सुटल्यानंतर दुभाजकावरील फ्लॉवर पॉट आणि रस्त्याच्या कडेला असलेले कठडयाचे दगड यामुळे अधिक नुकसान होत असल्याचे आढळून आल्याने ते काढून टाकणे.

vii) वाहनाचे ब्रेक निकामी झाल्यास वाहने रस्त्यापासून बाजूला घेऊन चढावावर जावून सुरक्षितरित्या थांबतिल अशा प्रकाराणे टक रनअवे कॅंप तयार करणे.

viii) द्रुतगती मार्गावर/महामार्गावर वाहनचालकांना शिस्त लावण्याकरीता महामार्ग पोलिसांकडून कसूरदार वाहनांवर वेळोवेळी कारवाई करण्यात येते.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**बीड जिल्हयातील महिला बचत गट व आवास बचत गटांच्या नोंदणीबाबत**

**(४८) ३४३६७ (११-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बीड जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमधून दिनांक ३० जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास किती महिला बचत गट व आवास बचत गटांची नोंदणी करण्यात आलेली आहे,

(२) असल्यास, जिल्हयातील नोंदणीकृत महिला बचत गटापैकी किती बचत गट बंद करण्यात आले आहेत, तसेच जिल्हयातील किती महिला बचत गटांना रिवायडींग फंड देण्यात आला आहे,

(३) असल्यास, सन २०१५-१६ ते २०१६-१७ आणि २०१७-१८ या वर्षात

महिला बचत गटासाठी किती निधी खर्च करण्यात आला आहे, तसेच बीड जिल्हयातील सन २०१५-२०१६ ते २०१६-१७ या वर्षात किती महिला बचत गटांनी विक्री प्रदर्शनात सहभाग घेतला आहे,
(४) असल्यास, सदर बचत गटाच्या विक्री प्रदर्शनासाठी सन २०१५-१६, २०१६-२०१७ वर्षात किती निधी खर्च करण्यात आला आहे ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७)** : (१) दिनांक ३० जून, २०१७ व त्यादरम्यान एकूण ५,४२२ महिला बचत गटांची नोंदणी झालेली आहे.
(२) नोंदणीकृत सर्व महिला बचत गट कार्यरत आहेत. एकूण ३,४५५ महिला बचत गटांना रिवॉलव्हिंग फंड देण्यात आलेला आहे.
(३) सन २०१५-१६ या वर्षात रु. ४४.०० लक्ष व २०१६-१७ या वर्षात रु. २९०.८६ लक्ष आणि २०१७-१८ या वर्षात रु. ४८.४८ लक्ष इतका निधी खर्च करण्यात आला आहे. बीड जिल्हयातील सन २०१५-१६ या वर्षात ४१ व सन २०१६-१७ या वर्षात २९ महिला बचत गटांनी विक्री प्रदर्शनात सहभाग घेतला आहे.
(४) सन २०१५-१६ या वर्षात रु. ५.६८ लक्ष व सन २०१६-१७ या वर्षात रु. ०.७६ लक्ष इतका निधी खर्च करण्यात आला आहे.

---

## राज्यातील सहा जिल्हयातील जमिनीची पुनर्मोजणी केल्याबाबत

**(४९) ३४३८० (०७-०८-२०१७). श्री.अनिल भोसले, श्री.नरेंद्र पाटील : दिनांक ३० मार्च, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक १ मधील प्रश्न क्रमांक १९४२५ ला दिनांक ३० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर व रायगड या सहा जिल्हयातील जमिनींची पुनर्मोजणी करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या जिल्ह्यातील जमिनींची मोजणी करण्याच्या कामाला गती देण्याच्या कामासंदर्भात शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१८-११-२०१७) :** (१), (२) व (३) ग्रामीण भागातील जमिनींची पुनर्मोजणी करण्यासाठी दि. ६/१०/२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. पहिल्या टप्प्यामध्ये पुणे, रायगड, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या ६ जिल्ह्यांचा समावेश करण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने जिल्हानिहाय स्वतंत्र ई-निविदा (RFP) दि. ३१/०३/२०१७ रोजी शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आल्या. सदर निविदांबाबत दि. २४/०४/२०१७ रोजी झालेल्या प्री बीड मिटींग मध्ये उपस्थित झालेल्या मुद्दयांच्या अनुषंगाने निविदांमध्ये आवश्यक ते बदल करण्यात आले व दि. १०/१०/२०१७ पर्यंत निविदा मागविण्यात आल्या. पुणे, रायगड व नाशिक जिल्ह्यांकरीता ३ पेक्षा कमी निविदा प्राप्त झाल्याने या जिल्ह्यांकरीता निविदा सादर करण्यास दि. २७/१०/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली. अशा प्रकारे यासंदर्भातील निविदा प्रक्रिया सुरु असून निवड होणाऱ्या एजन्सीस कार्यादेश देण्याची कार्यवाही नजिकच्या कालावधीत पूर्ण होणे अपेक्षित आहे.

---

## औरंगाबाद जिल्ह्यातील डोंगरांचे संरक्षण करण्याबाबत

**(५०) ३४४२४ (०६-०८-२०१७). श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकीय जमिनी कोणत्याही व्यक्तीला, संस्थेला मंजूर करु नयेत असे मा.सर्वोच्च न्यायालयाचे आदेश असतानाही औरंगाबाद जिल्ह्यातील प्रत्येक तालुक्यातील डोंगर पोखरण्यासाठी जिल्हा प्रशासनातर्फे परवाने देण्यात आल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यामुळे डोंगराचे अस्तित्वच नष्ट होणार असून जनावरांच्या चारांचा व पिण्याच्या पाण्याचा प्रश्न निर्माण होणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने डोंगर पोखरण्यास मान्यता देणाऱ्या संबंधित अधिकारी व कर्मचारी यांच्यावर कारवाई करून औरंगाबाद जिल्ह्यातील डोंगरांचे संरक्षण करण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२४-११-२०१७) :** (१) व (२) असे निदर्शनास आले नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**नागपूर.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण : शासकीय मुद्रणालय, नागपूर